त्या वीरांगना दुर्गावती राणीने तसे काहीएक न करता शेवटच्या पेटलेल्या रणकुंडातच आपल्या अनेक सहकारी स्त्रियांसह देहाचा होम केला! तरीही राजा वीरनारायण यानेही मुसलमानांशी लढाई चालूच ठेवली. पण शत्रूच्या प्रचंड बलापुढे काही कालानंतर लढणे त्याला अशक्य होऊन बसले. शेवटी त्याचे राज्य मोंगल राज्यास जोडण्यात आले.

अकबराने नंतर राजुपतांतील लवचिक स्वभावाचे जे जे राजे आढळले आणि मुसलमानांशी पिढ्यानपिढ्या लढण्याचा ज्यांना उबग आलेला होता अशा काही हिंदू राजांशी अत्यंत स्नेहाची आणि त्यांना मोंगल साम्राज्यात गौरवाने वागविले जाईल अशा अभिवचनांची मिष्ठास बोलणी चालू केली. या अकबराच्या धोरणाला अनुकूल असताही हे लवचिक रजपूत राजे चितोडच्या राण्याचा परंपरागत बाणेदारपणा पाहून पुनःपुन्हा आपला मोंगलसत्तेशी स्नेहसंबंध जुळविण्यास कचरतात, लाजतात आणि चितोडचे महाराणा तर आपले अस्तित्व मान्य करण्यास कट्टर विरोध करण्याचे सोडीत नाहीत, असे पाहून अकबराने प्रथमतः चितोडचाच पिच्छा पुरविण्याचे योजिले. पण काही केले तरी सामदामाने चितोड आपले स्वातंत्र्य गमाविण्यास सिद्ध होत नाही, हे पाहून सन १५६७त अकबराने चितोडवर स्वारी करून त्यास वेढा दिला. त्यावेळी बाबराशी लढलेल्या विख्यात राणा संगचा मुलगा उदयसिंह हा चितोडचा राणा होता; परंतु त्याचे अंगी आपल्या पूर्वजांच्या पराक्रमाचा लेशसुद्धा नसल्याने तो रानावनात पळून गेला. पण चितोडची सारी राजसत्ता त्याच्या ज्या एका नायकिणीच्या हातात एकत्र झालेली होती, तिने साऱ्या राजपूतात पराक्रमाचे स्फुरण संचरविले. चितोडच्या मोठमोठ्या सरदार जयमल्ल, पत्त आणि इतर राजपूत पुढाऱ्यांनी उदयसिंह पळून गेला तरी मोगलांशी तुंबळ युद्ध चालूच ठेविले. पुढे जयमल्ल नि पत्त हे दोघेही रणांत मारले गेले. तेव्हा पराभव निश्चित होणार हे जाणून हताश न होता ती राजपुतांची हिंदू वीरजाती अधिकच चिडून उठली. सर्व सैनिकांनी रणात प्राणावर उदार होऊन एकच ‘हरहर महादेव’ केला! मुसलमानांच्या मुंडक्यांच्या राशी पडल्या. त्या रणनिकरात आपले राजपूत योद्धे बहुतेक कापले गेले असे दिसताच चितोडच्या वीरपरंपरेप्रमाणे सर्व राजपूत स्त्रियांनी आधीच रचलेली प्रचंड चिता पेटवून दिली आणि आपल्या स्वधर्माचा जयजयकार करीत जिवावर उदार होऊन मुलालेकरांसुद्धा तटावरून त्या चितते पटापट उड्या घेतल्या! हिंदू वीरांगना भस्म होऊन गेल्या, पण दुष्ट म्लेंच्छांचा त्यांनी स्वतःस स्पर्श होऊ दिला नाही! हा चितोडचा तिसरा जोहार होय.

पण, हिंदुपक्षात एवढा हाहाकार उडालेला पाहूनही आजच्या लाचार हिंदु इतिहासकारांनाही, जो परम उदार, हिंदुमुसलमानांच्या एकीसाठी तळमळणारा, हिंदूंना पूर्वी कोणत्याही मुसलमानी राजाने वागविले नसेल इतक्या उदारतेने वागविणारा, केवळ मुसलमानी ‘रामराजा’च असा जो मोंगल बादशहा वाटतो तो हिंदूमध्ये हाहाकार उडवून देणारा अकबर हाच होय!

परंतु चितोडच्या स्त्री-पुरुष-बालकांच्या ह्या हत्याकांडानेही समाधान न पावलेला अकबर चितोडच्या रक्तबंबाळ नगरात शिरून जे उरले-सुरले हिंदू नागरिक आक्रांत करीत होते त्या सर्व हिंदू पुरुषांची, आणि ध्यानात ठेवा! हिंदू स्त्रियांचीही त्याने सरसकट कापाकापी केली. तीस

सहस्र राजपूत हिंदू या एका चितोडच्या युद्धात मृत्युमुखी पडले! नंतर माणसांप्रमाणेच चितोडचे दगडधोंडे इत्यादी निर्जीव पदार्थही मुसलमानांचे शत्रूच आहेत असे वाटून की काय त्या राक्षसी विध्वंसकाने, बादशहा अकबराने, हिंदूंची देवळे, मंदिरे, राजवाडे, घरेदारे इत्यादी उभे दिसेल ते ते धडाधड पाडवून मातीला मिळवून दिले. चितोडच्या नगरदेवीच्या देवळाचा, मूर्तीचा आणि सर्व परिसराचाही तसाच विनाश करून तेथील नगारे, दिवे, दुंदुभी (नौबती) दागिने, द्वारे इत्यादी सर्व प्रचंड वा मूल्यवान वा हिंदुप्रिय पदार्थ तिकडे आग्र्यास धाडून दिले. चितोडच्या हिंदु राजधानीच्या अशा अमानुष नायनाटाने त्याची धर्मोन्मत्त पिपासा थोडीशी शांत झाल्यावर तो मुस्लिम बादशहा अकबर त्या ‘सत्कृत्या’ ने स्वतःस गाझी म्हणवीत दिल्लीस परत गेला!

आणि इकडे ह्या आपल्या राजधानीच्या आणि राज्याच्या विध्वंसाचा प्रतिशोध घेता न आल्याने चार वर्षे रानावनात भटकत राहिलेला राणा उदयसिंह राज्यभ्रंशाच्या दुःखाने सन १५७२त मरण पावला!

## हिंदुकुलभूषण राजा प्रतापसिंह

उदयसिंहाचा मुलगा राणा प्रतापसिंह. तो लगोलग चितोडच्या अस्तित्वात नसलेल्या काल्पनिक सिंहासनावर बसला! तथापि, झाडून साऱ्या जातिवंत राजपुतांच्या हृदयातील धर्मवीरत्वाचे नि अदम्य पराक्रमाचे सिंहासनच त्याला अर्पिले गेल्यामुळे तो राणा प्रताप एखाद्या सत्यसत्य राणा प्रतापाप्रमाणेच सिंहासनाधीश्वर शोभू लागला! तो राणा, राजपुतांचा परंपरागत राणेपणाचा, बाणा, प्राण गेला तरी न सोडणारा असाच निघाला. अनेक यातना सोसून, त्याने अकबराशी अपमानास्पद मित्रत्व न करता, त्या अत्यंत प्रबल मुस्लिम बादशहाचे स्वधर्मस्वातंत्र्यासाठी शत्रुत्व करणेच भूषणास्पद नि हिंदूजीवनाचे नि हिंदुनृपत्वाचे खरे साफल्य आहे, असे तो मानता झाला!

त्याने मुसलमानांच्या हाती चितोड नगर पडलेले असल्यामुळे इतर नगरग्रामांतून आपली फिरती राजधानी त्या संकटकालात आपल्यासमवेत भटकवीत नेली आणि मुस्लिम सैन्याच्या सत्तेखालून हळूहळू पुष्कळ प्रदेश मुक्त करून स्वतःचे एक जिवास जीव देणारे सैन्यही उभारले. त्याच्या ह्या काळातील पराक्रमाचे आणि रणप्रसंगाचे वर्णन रोमहर्षक असताही स्थलाभावी येथे देता येत नाही.

शेवटी, त्याचा प्रभाव इतका वाढला की, प्रत्यक्ष अकबरलाच आपले बादशाही सैन्य राणा प्रतापचा नायनाट करण्यासाठी धाडावे लागले. त्यावेळी अकबरास शरण गेलेला जयपूरचा राजा मानसिंग नि बाटलेला रजपूत सरदार महाबतखान ह्या सरदारांसह स्वतः राजपुत्र सलीम हा अकबर बादशहाचे आज्ञेवरून राणा प्रतापावर चालून गेला. ह्याचवेळी ती अत्यंत निकराची

गाजलेली हळदीघाटाची लढाई झाली. लढण्याचा आवेशात राणाप्रतापने आपला घोडा सरळ सलीमच्या हत्तीवर घातला आणि त्या इतिहासप्रसिद्ध चेतक घोड्यानेही न डगमगता सलीमच्या हत्तीच्या सोंडेवरच झेप घेऊन आपल्या टाचा रोविल्या. बिजलीच्या चमकेप्रमाणे एका क्षणात सलीमच्या कंठाच्या इतक्या जवळून राणा प्रतापचे तेजस्वी खड्ग चमकून गेले, इतक्या जवळून की सलीमला अंधेरीच यावी, आणि त्याने मागे घ्यावे. आपल्या वारातून शत्रु निसटला असे पाहताच क्षणार्धात राणा प्रताप घोडा परत घेऊन पुन्हा रणांगणात घुसून दिसेनासा झाला.

राणा प्रतापसिंह या अनिर्णीत लढाईतून जो निसटला तो त्याच्यासमवेत त्याच्या इतक्याचा निकराने आणि त्याच्याच ह्या पराक्रमानेच उद्युत्त झालेल्या चितोड राज्यातील सहस्रावधि राजपूत वीरांच्या समूहासह साऱ्या मेवाडभर मुसलमानांचा नायनाट करीत, वृकयुद्धाचा (गनिमी काव्याचा) धुमाकूळ घालीत चालला. एक चितोड नगर तेवढे सोडून, त्याने मेवाडचे सारे राज्य स्वतंत्र केले. शेवटी राणा प्रतापने आपली फिरती राजधानी उदेपूर येथे स्थिरस्थावर केली, ती मात्र शेवटपर्यंत अकबराच्या हाती पडली नाही. अकबराने राणा प्रतापशी मैत्री करण्याचेही अनेक धूर्त प्रयत्न केले, पण, राणा प्रताप काही केल्या त्यांना बळी पडला नाही. त्याच्याराजवटीत इतके अद्भुत, रोमहर्षक, स्वदेशाभिमान नि स्वधर्माभिमान यांनी रसरसलेल्या आणि सामान्य मेवाडी राजपूत नागरिकांपासून तो त्या मेवाडच्या अलौकिक महाराण्यांपर्यंतच्या कृत्यांपर्यंतचे प्रसंग घडलेले आहेत की, त्यांचे, आमच्या हिंदु तरुणांनी रामायणातील किंवा महाभारतातील वीरोत्तमांच्या आख्यानांप्रमाणेच धर्मबुद्धीने पाठांतर केले पाहिजे. सुदैवाने राजपूत वीरभाटांचे असे रसरसलेले 'रासो' अगदी भूषण कवीच्या काळपर्यंतचे अद्यापि उपलब्ध आहेत. त्यांना माध्यमिक शाळांतून तरी अपरिहार्य वाचनीय पुस्तके म्हणून नेमले गेले पाहिजे. अशा या आमच्या 'समीक्षणात्मक' ग्रंथात त्यांचे उतारे देण्यालासुद्धा स्थल नाही. आणि आता माझ्या या सरत्या नि मावळत्या जीवनात वेळही उरला नाही. हा थोर हिंदुकुलभूषण राणा प्रतापसिंह लवकरच सन १५८१त मरण पावला.

## पंजाबात एका नवीन हिंदुशक्तीचा शीख संप्रदायाचा उदय

पंजाबमधल्या श्री गुरुनानक ह्या नावाच्या एका साधु पुरुषाने पंधराव्या शतकाच्या शेवटी एक धर्मपंथ स्थापला. त्याचे जेवढे अनुयायी होते, शिष्य होत, त्यांचा लवकरच एक संघ बनला. ते स्वतःला श्रीगुरू नानकाचे शिष्य म्हणून 'शीख' असे म्हणवून घेत. श्रीगुरू नानक हा स्वतः गृहस्थाश्रमीच असून ईश्वराची आराधना आणि जनसेवाही भक्तिमार्गानेच सुसाध्य असते, असे तो सांगे. मनुष्यमात्र हा भक्तिमार्गाचा अधिकारी आहे. त्याकाळी पंजाबात काय किंवा भरतखंडभर काय, मुसलमानांनी हिंदुधर्माचा एकच उच्छेद मांडलेला होता आणि मुसलमानी साम्राज्य स्थापण्यासाठी लढाया नि युद्धे यांचा मुसलमानांनी धुमाकूळ मांडला होता. त्यांना भरतखंडभर हिंदुराज्यकर्त्यांनी आणि जनतेने समरांगणात नेटाचा प्रतिकारही चालविला होता. अल्लाउद्दिन सारख्याच्या होऊ घातलेल्या साम्राज्याचे तुकडे तुकडे उडवून हिंदूंनी विजयनगरसारखे स्वतंत्र नि प्रबळ हिंदू राज्यही पुन्हा स्थापन केले होते, हे सर्व पूर्वी कथन केलेलेच आहे. राजपुतान्यांत, गोंडवनात हिंदुराजांच्या पराक्रमी सैन्यांनी मुसलमानांची वारंवार धूळधाण उडवून दिली होती.

**श्री गुरूनानक** : पंजाबात मात्र मुसलमानांच्या राजसत्तेला प्रबळ आव्हान देणारा हिंदू असा कोणी उरला नव्हता. अशा परिस्थितीत श्री गुरूनानक पंजाबात उपदेश देऊ लागला की हिंदु आणि मुसलमान हे दोघेही ईश्वराच्या दृष्टीने सारखेच आहेत, दोघेही माझ्या या भक्तिमार्गाने गेले असता मोक्ष पावू शकतात. दोघेही भाऊ भाऊच आहेत. माझ्या पंथात हिंदू आणि मुसलमान असा भेद मी मानीत नाही, असे जरी श्री गुरुनानक जीव तोडून सांगत होता, तरी त्याच्या शिष्यवर्गात सहस्रांतून एखाददुसराच मुसलमान शिष्य आढळून येई. इतर सर्व हिंदूच हिंदू त्याच्या पंथांत होते. स्वतः श्री गुरूनानक हा जातीने वैश्य (बनिया) होता. श्री गुरू नानक सन १५३८ मध्ये मरण पावला. त्याला जरी स्वतःचे पुत्र होते तरी ते त्याच्या मताला अनुकूल नव्हते. त्याने (गुरूनानकाने) आपला शिष्य अंगद याचीच आपल्या मागून आपल्या पंथाच्या गुरूपदावर स्थापना केली. तथापि, त्याच्या मरणापर्यंत श्री गुरूनानकाच्या पंथास एक भक्तिपंथ, भजनी संप्रदाय एवढेच प्रमुख स्वरूप होते आणि त्यांची संख्याही राजकारणाच्या दृष्टीने अगदी उपेक्षणीय होती. तथापि त्यांच्या काही वचनांतून हिंदु लोकांच्या त्या वेळच्या दुःस्थितीविषयी शोकमय उद्‌गार निघालेले आहेत. उदाहरणार्थ.

**क्षत्रियांही धरम छोडियां, म्लेंच्छ भाखा गही ।**
**सृष्टी सब अकवर्ण हुई धर्मकी गति रही ।**
**नीलवर्णके कपडे पहने, तुरक पठाणी अमल भया ।।**

अशी अनेक चरणे त्याच्या नावावर त्यांची म्हणून लोकांत रूढ आहेत. इतर हिंदुसंतांप्रमाणेच गुरू नानकानेही समाजातील अनेक भाबड्या नि वेडगळ चालीरीतींचा निषेध केलेला आहे.

गुरू अंगदानंतर तिसरा गुरू अमरदास नि सन १५७४त चौथा गुरू रामदास हे झाले. त्यांची नि अकबर बादशाहाची भेट झाली असे म्हणतात. बादशहाने गुरु रामदास यांना एक विस्तीर्ण भूमी ‘इनाम’ म्हणून दिली. त्याच भूमीवर गुरु रामदासाने एक सुंदर सरोवर आणि त्याचे काठी एक मंदिर बांधले. तेच आजचे ‘अमृतसर’ होय! गुरू रामदास सन १५८१त वारला. पांचवा गुरू अर्जुनमल्ल हा झाला. त्याच्याच राजवटीत शिखांची वाढ झपाट्याने होऊ लागली. कारण, त्यांना अमृतसर येथे सार्वजनिक कैंद्र मिळाले होते. त्यातही गुरु अर्जुनाने आपल्या ह्या वाढत्या पंथाला एक पंथाचा मुख्य ग्रंथ असावा एवढ्यासाठी श्री गुरू नानकाची शक्य ती वचने एकत्र करून आणि त्यासह तत्कालीन इतरही काही संतांची वचने गोवून सर्व शिखांना प्रमाण व्हावा असा एक ग्रंथ निर्माण केला आणि त्यासच ‘गुरुग्रंथ’ किंवा ‘आदिग्रंथ’’ असे नाव दिले. ह्या ग्रंथात कबीराची वचने आहेत, महाराष्ट्रातील संत नामदेव तीर्थयात्रेस पंजाबात गेले असता त्यांच्या भक्तिमार्गाचा आणि अभंगांचा तिकडे पुष्कळ प्रचार झाला होता. श्री गुरू नानकांची शिकवण नि संत नामदेवाची शिकवण ही समानच आहे असे पाहून संत नामदेवांच्याही काही मराठी कविता गुरुग्रंथात गोविलेल्या आहेत. हा ग्रंथ प्राकृतात आहे. ह्याच प्राकृतास सध्या पंजाबी म्हणतात. त्याकाळी केवळ शास्त्रीय विषय लिहिण्यासाठीच जिचा विद्वानवर्ग बहुधा पंजाबकडे उपयोग करीत नि त्यामुळे जिला ‘शास्त्री लिपी’ असेच म्हणत, त्या देवनागरीत मुळातच तो ग्रंथ लिहिलेला नव्हता. आपल्या इकडे ज्याप्रमाणे अगदी कालपरवापर्यंत मोडी लिपी वापरीत त्याप्रमाणे, पंजाबात त्या पत्रव्यवहारदि सामान्यजनांच्या मोडी लिपी वापरली जाई त्या प्राकृत लिपीतच तो ग्रंथ लिहिला गेला. तिला साधारण लोकांत लुंडोमुंडी असे म्हणत. परंतु गुरुग्रंथ त्या लिपीत लिहिला गेल्यानंतर शीख लोकांनी गुरुंनी स्वीकारलेली लिपी म्हणून तिचा विशेष गौरव व्हावा यास्तव ‘गुरूमुखी’ असे त्या लिपीला म्हणण्यास आरंभ केला.

जहांगीर बादशहा झाल्यानंतर त्याचा वडील मुलगा खुश्रू ह्याने बादशहाविरूद्ध बंड केले. खुश्रू पंजाबात पळून गेला. त्यावेळेस शीख गुरु अर्जुनदेवाने त्यास आपल्याकडे उतरू दिले. त्यामुळे चवताळून जहांगीर बादशहाने अर्जुनदेवास पकडून त्याचा वध केला. शिखांच्या इतिहासात मुसलमानांशी लढताना स्वधर्मासाठी आपल्या प्राणांचे बलिदान करणारा गुरू अर्जुन हाच पहिला वीर गुरू होय! याच गुरू अर्जुनदेवाच्या काळी शीख लोकांत एक स्वतंत्र संघटना बांधण्याची ईर्षा उत्पन्न होऊन प्रत्येक शीख पंथीयाने एक ठराविक धार्मिक कर गुरूस दिलाच पाहिजे अशी पद्धती चालू केली गेली आणि पंथात सैनिक शक्तीही वाढावी म्हणून सैनिक आघाडीही उघडण्यात आली.

त्या गुरूच्या वधामुळे शिखांत मुसलमानांविरुद्ध त्वेषाची लाट गुप्तपणे वाढत चालली. त्यांच्या अनुयायांत विशेषतः लढवय्या हिंदु जाट जातीच्या शेतकरी लोकांचाच त्याकाळी आणि

शेवटपर्यंतही भरणा झालेला होता. हे हिंदु जाट त्या पंथांत सामावलेले आणि सबळ असल्याने त्या पंथाविषयी पंजाबच्या सर्वच हिंदु लोकांत ममतेची आणि एकात्मतेची भावना होती. शिखात जसजसा मोंगलाच्या धार्मिक छळापायी हिंदु म्हणून, हिंदु धर्माचे संरक्षक म्हणून, शीख पंथाचे कट्टर अनुयायी म्हणून सैनिक प्रवृत्तीचा नि संघटनेचा प्रसार होत गेला, तसतसा त्यांच्या पंथाकडे एक उपद्रवी हिंदु सैनिक केंद्र या दृष्टीने मोंगल सरकार कटाक्षाने पाहू लागले.

अर्जुनचा पुत्र गुरू हरगोविंद याने लवकरच बादशहास कर देण्याचे नाकारले. तेव्हा त्याला धरून बादशहाने बारा वर्षेपर्यंत कारागृहात कोंडले. पुढे सुटका होताच त्याने त्या वेळचा मोंगल बादशहा जो शहाजहान त्याचे विरुद्ध उघड बंड केले तरीही त्याकडे मोठेसे महत्वाचे विरोधी केंद्र म्हणून न बघता एक लहानसे बादशाही सैन्य शहाजहानने धाडले. परंतु, संग्राम येथे अकस्मात शीख इतक्या त्वेषाने लढले की, त्या मुस्लिम सैन्यपथकाचा पराभव झाला. त्यामुळे, पंजाबातील हिंदूंना जरी आश्चर्य आणि आनंद वाटला तरी बादशहाने काही तिकडे विशेष लक्ष दिले नाही. गुरु हरगोविंद सन १६४५ त मरण पावला. त्याच्यानंतर हरराय, हरकिशन नि तेजबहादुर असे गुरु झाले. पण, ह्या गुरुपीठाला खरे तेज आणि नैतिक सामर्थ्य असे वस्तुतः गुरू तेज बहादुराच्या धर्मकार्यी केलेल्या दैदीप्यमान बलिदानानेच चढले. गुरु तेजबहादुर हा आनंदपूर येथे वास्तव्य करी. हिंदूंना बळाने मुसलमान केले जाण्याचा अत्याचार पंजाबात ठिकठिकाणी वारंवार घडत असे. अशा वेळी गुरू तेज बहादुराने आणि त्याच्या शीख सैनिकांनी मुसलमानांचा प्रतिकारही अनेकदा केलेला होता. इतक्यात नरराक्षस औरंगजेबाने सर्व हिंदुजगतासच मुळापासून उपटून काढण्याचा अघोर निश्चय केला. साऱ्या भरतखंडभर त्याच्या त्या दुष्कार्याचा हिंदुजगतानेही घोर विरोध मांडला. तोच, काश्मीर येथील समग्र ब्राह्मणवर्गावर औरंगजेबाने धर्मांतराच्या तलवारीची धार धरून आज्ञा सोडली की, काश्मीरच्या श्रेष्ठ समजल्या जाणाऱ्या सर्व ब्राह्मणांनी एक तर मुसलमान व्हावे, नाही तर काफरांवर औरंगजेबाने लादलेला असह्य कर त्यांनी द्यावा. तेव्हा, तिकडे हाहाकार उडाला. अशा प्रसंगी 'गुरू तेजबहादुराने एखाद्या धैर्यमेरूसारखे हिंदूंना सांगितले, "देऊ नका! स्वधर्मासाठी प्राण सोडा, पण स्वधर्मास सोडू नका!" हिंदू लोकांनी अशी बाणेदार उत्तरे देण्यास प्रारंभ करताच औरंगजेब चिडून गेला आणि त्याने श्री गुरू तेजबहादुराला पकडून आणून शिक्षा सांगितली की, "तू एक तर मुसलमान हो, नाही तर मृत्युदंडास सिद्ध हो!" तेव्हा धर्मवीर गुरु तेजबहादुराने, "हिंदुधर्माचा त्याग मी केव्हाही करणार नाही, तुला वाटेल ते कर, जा," असे बाणेदार उत्तर दिले. तेव्हा अधिकच कृद्ध होऊन औरंगजेबाने शीखगुरु तेजबहादुराचा तत्काल शिरच्छेद केला. ती गोष्ट सन १६७५ त घडली. ह्याच बलिदानप्रसंगी गुरु तेजबहादुरासमवेत त्याचे कित्येक हिंदू शिष्यही धरले गेले होते, त्या सर्वांनीही मुसलमानी धर्म स्वीकारण्याचे नाकराल्यामुळे त्यांचेही भयंकर हाल करून कित्येकांचा शिरच्छेद करण्यात आला, तर काही ठळक हिंदु वीरात्म्यांना करवतीने त्यांची मस्तके दुभंग करून ठार मारण्यात आले. ह्या हिंदु हुतात्म्यांतच श्री भाई मतिदास हेही मारले गेले. ह्या मतिदासांच्या कुलास भाई ही प्रेमळ पदवी शीख गुरूकडून अर्पिलेली

होती. ह्या हुतात्मा भाई मतिदासांच्या कुलात आपले पंजाबमधले अर्वाचीन हिंदुराष्ट्रभक्त भाई परमानंद हे जन्मलेले होते. ह्याच बीर गुरूचा पुत्र म्हणजे पुण्यप्रताप हिंदुराष्ट्रवीर श्री गोविंदसिंह हा होय!

**हिंदुराष्ट्रवीर श्री गुरू गोविंदसिंह** :- शीख संप्रदायास अक्षरशः खड्गाचे पाणी चढवून त्याचा एक पोलादी लढाऊ नि दुर्भेद्य दुर्ग करण्याचे महत्कार्य जे केले आणि त्यायोगे शिखांच्या पंजाबातील महाराजा रणजितसिंगांच्या काळची प्रबळ नि स्वतंत्र अशी हिंदुराजसत्ता नि धर्मसत्ता स्थापण्याच्या हिंदुराष्ट्रकार्याची मूळ प्रेरणा जर कोणी इतक्या बलवत्तरपणे दिली असेल तर ती श्री. गुरू गोविंदसिंह ह्यानेच होय! हे सत्य विशदविणाऱ्या श्री गुरू गोविंदसिंहाच्या - ज्याला शीखच नव्हेत तर सारे पंजाबीय हिंदु त्या काळीसुद्धा प्रेमाने दशम बादशहा म्हणत. कारण, तो गुरू नानकापासून दहावा गुरू होता. जीवनांतील अनेक पराक्रमी आणि रोमांचकारी घटनापैकी स्थलाभावी एकच घटना जरी येथे सांगितली तरी पुरे आहे.

गुरु नानकानंतर प्रत्येक मोठ्या धार्मिक संप्रदायाच्या प्रकरणी जे घडते तसे घडून गुरू नानकाच्या शिष्यांमध्ये अनेक पंथोपपंथ पडले. पण, ते सर्व शिष्य हिंदुसमाजाचे जीवन जगत होते. लग्ने, कार्ये इत्यादी सर्व सामाजिक व्यवहारांत ते हिंदुसमाजापासून कोणत्याही प्रकारे विलगलेले नव्हते. हिंदुसमाजातील प्रत्येक संप्रदायाप्रमाणे त्यांची म्हणून काही धार्मिक मते असते. गुरुग्रंथात नामदेव, कबीरसुद्धा अनेक हिंदुसंतांच्या वाणी (वचने) स्वतः नानकाच्या वाणीसमवेत एकत्रच दिलेल्या आहेत; आणि गुरु नानकापासून तो त्यांचा आद्य ग्रंथ वाचताना शिखांच्या धर्मपीठातून त्या सर्व वाणींना सारखेच पवित्र समजून अद्यापपर्यंत तसाच वाचला जातो. गुरु नानकाच्या एका पुत्रानेच एक पंथ काढलेला होता. असे उपपंथ निघता निघता जेव्हा शिखांवर हिंदुधर्माच्या रक्षणासाठी म्हणजेच शीखधर्माच्या रक्षणासाठी मोगलांशी लढताना वर सांगितल्याप्रमाणे शिखांचेच एक शस्त्रसज्ज दल उभारावे लागले तेव्हा काही काळाने गुरु गोविंदांच्या मनात स्वराज्य स्थापण्याची महत्वाकांक्षा जागृत होताच त्याला एक 'गुरूच्या' जीवास जीव देणारे, सशस्त्र युद्धालाच वाहून घेणारे आणि अत्यंत संघटित असे एक शिखांतूनच निवडलेले स्थायी सैन्य स्थापावे, असे वाटू लागले.

तेव्हा गुरु गोविंदसिंहाने सर्वसामान्य शिखांची एक मोठी महासभा बोलाविली अशा प्रसंगाविषयीची त्या प्रसंगाच्या आगेमागे शिखांनी लिहिलेल्या पद्यमय ग्रंथातून हिंदूंच्या पुराणातील रसभरित वर्णनाच्या पध्दतीवर वर्णने केलेली आहेत. पण, त्यांतील इतिहासास धरून असलेला तेवढाच सारंश येथे देतो.

शिखांची महासभा भरविल्यानंतर गुरु गोविंदाने विचारले की, स्वधर्मासाठी प्राणत्याग करण्यास केव्हाही सिद्ध असणाऱ्या आणि सैन्यातच आपले जीवन व्यवसाय म्हणून घालविण्यास

सिद्ध असणाऱ्या शिखांचे एक स्थायी सैन्य मला उभारावयाचे आहे. तरी या कडक व्रतास अंगीकारणाऱ्या शिखांनी मला आपली नावे कळवावीत. पुढे तशा शिखांतून गुरूंनी स्वतः प्रथमतः पाच शिखांची निवड केली. त्यापैकी, प्रत्येक शिखाची प्रवृत्ती पोलादाप्रमाणे तेजस्वी नि धारदार असली पाहिजे, हे तत्व त्यांच्यात बिंबविण्याकरिता त्या निवडक पाचांचा पहिला संकल्प जो करण्यात आला तो म्हणजे एका धारदार पोलादी खंड्यास (लहान खड्गास) पाण्यामध्ये काही मंत्र म्हणत ढवळून ते मंत्रित पोलादी पाणी त्या शिखाच्या डोक्यावर शिंपडले जाई. नंतर आपल्या कटीला त्याने सदोदित कृपाण बांधलेच पाहिजे, हा दुसरा नियम त्याला पाळावा लागे. त्याने आपल्या शरीरवरचे केस केव्हाही कापता कामा नयेत; त्याचप्रमाणे त्याने सदोदित लंगोटबंद (कच्छधारी) असले पाहिजे आणि हातात त्याने घेतलेल्या लढाऊ व्रताचे प्रतीक म्हणून एकेक पोलादी कडे आणि केसात एक कंगाही (फणी) धारण केली पाहिजे, केश, कंगा कच्छ, कडे आणि कृपाण हीच अशा प्रत्येक व्रतस्थ लढाऊ शिखाला धारण करावी लागणारी पाच चिन्हे होत. यांनाच पाच कक्के म्हणतात. शीख समुदायातून ह्या विशिष्ट वीरदलात ज्या वरील प्रकारच्या व्रतस्थ शिखांना गुरूंनी त्या वेळेपासून स्वतः निवडून घेतले त्याच शीखदलास 'खालसा' हे पुढे भारतभर प्रसिद्धीस आलेले नामकरण प्राप्त झाले. खालसा हा शब्द उर्दू आहे. त्याचा मूळ अर्थच 'निवडलेले' असा आहे.

ह्या खालसा सैनिकांची वाढ अष्टांकापर्यंत होताच गुरुगोविंदाने पंजाबात लहान लहान हिंदू-मुसलमान संस्थानिकांना नि प्रदेशांना जिंकून किंवा लुटून घेण्याचा उपक्रम चालविला. अर्थातच तो त्या वेळचा मोगल बादशाह आणि गुरु गोविंदाच्या पित्याला, श्री गुरु तेजबहादुरांना- हिंदुधर्म न सोडण्यासाठी ठार मारणारा दुष्ट शत्रू औरंगजेब त्याने गुरु गोविंदालाही पकडून आणण्यासाठी मोंगल सैन्य पंजाबात धाडले. त्याच्याशी ज्या चकमकी 'खालसा' सैन्याच्या झाल्या, त्यामुळे गुरूने स्वतःसच आनंदपूरच्या गडात कोंडून घेतले. मोंगलांनी तत्काल गुरुला वेढा घातला. गुरूसमवेत जे खालसा सैन्य गडातून लढत होते त्यांतच गुरुचे दोघे अठरा वर्षाच्या वरील नि दोन आतील वीरपुत्र होते. आपल्या सैन्यास उत्तेजण्यासाठी नि पुत्रांचीही परीक्षा पाहण्यासाठी त्या पराक्रमी गुरुने एके दिवशी आपल्या त्या दोन पुत्रांस ससैन्य गडाबाहेर पडून मोगलांशी लढण्यास धाडले. त्या असम लढाईत त्याचे दोन्ही पुत्र मारले जात असता या अलौकिक वीर पित्याने 'वाह! वाह!' म्हणून सारखा जयध्वनी चालू ठेवला होता. रात्र होताच लढाई नित्याप्रमाणे थांबली आणि ते आलेले खालसा सैन्य चोरून मारून गडात पुन्हा घुसले. पण त्या खालसा (निवडक) सैन्यातील अनेकांचा धीर मात्र बाहेर रणांगणावरच सुटलेला होता. ते पाहून गुरुने सर्वांना स्पष्टपणे सांगितले की ज्यांना आपला जीव वाचविण्यासाठी मला सोडून खालसातून बाहेर पडायचे असेल त्यांनी तत्काल तसे करावे. मी मात्र क्वचित या गडाबाहेर पडून लढाई अशीच चालविणार आहे. तेव्हा त्या अगदी 'निवडलेल्या' तीलही (खालसांतीलही) अनेक शीख गुरुसेवेची त्यागपत्रे देऊन गुरु गोविंदाला सोडून रातोरात गडाबाहेर निघून गेले. लवकरच रात्री काळोखात

गोविंदसिंह त्याच्या उरलेल्या दहा-बारा वर्षाच्या आतील दोन मुलांसह सपत्नीक त्याच्या समवेत रहिलेल्या प्रामाणिक खालसा वीरांनाही निरोप देऊन, मुसलमानी वेढ्यातून किल्ल्याबाहेर निसटला.

गडातून त्या दुर्दैवी रात्रीच्या गाढ अंधारात आपल्या त्या दोन लहान मुलांसह श्रीगुरु गोविंदसिंह सपत्नीक जंगलात भटकत चालले असता शेवटी त्यांची नि त्यांच्या त्या दोन मुलांची ताटातूट होऊन ती लेकरे मुसलमानांच्या हाती पडली. त्या दुष्टांनी त्या दहा-बारा वर्षांच्या आतील लेकरांनाही 'तुम्ही एकतर हिंदुधर्म सोडून मुसलमान व्हा, नाही तर आम्ही तुम्हाला भयंकर हाल करून मारून टाकू' अशी धमकावणी दिली. तेव्हा सिंहाच्या छाव्याप्रमाणे निर्भयपणे गर्जत त्यांनी हिंदुधर्माचा त्याग करण्याचे अमान्य करून 'आम्ही स्वधर्मार्थ मरण्यास सिद्ध आहोत' असे उत्तर दिले. संकृद्ध मुसलमानी अधिकाऱ्यांनी शिक्षा दिली की, "या काफराच्या मुलांना भिंतीत चिणून ठार मारा." अर्थात, त्या दोघां ताठ उभे राहिलेल्या वीर कुमारांच्या भोवती विटांवर विटा रचून गळ्यापर्यंत चुनेरी पक्की भित उभारण्यात आली आणि गळा दाबून प्राण घेणाऱ्या शेवटच्या शिळा ठेवण्याच्या आधी पुन्हा एकदा विचारण्यात आले, "ए काफर, हिंदुधर्म छोडते हो या नहीं?" 'नहीं, नहीं, कदापि नही' दाबलेल्या आवाजात जितके उंच गर्जता येईल तितक्या उंच स्वरात ते दोन छावे हिंदुधर्माचा जयजयकार करीत असतानाच चुन्यामध्ये त्यांच्या मुखमस्तकांना गाडून टाकणाऱ्या शेवटच्या विटा मुस्लिम दैत्यांनी रचून टाकल्या.

हिंदु इतिहासातील हिंदुधर्मार्थ केलेल्या बलिदानाचे जे अमर भूषणास्पद प्रसंग आहेत त्यांतच गणना करण्यासारखा हाही प्रसंग आहे! शिखांच्या हृत्पटलावर तो प्रसंग जसा ज्या भाषेत रक्ताच्या रंगाने चित्रिला गेला आहे, असे त्यांनी लिहिलेल्या इतिहासात नि काव्यात आढळते. त्याचेच वर दिलेले संक्षिप्त वर्णन ही एक पुसट छाया आहे. इतिहास या दृष्टीने ती क्रूर घटना सत्य आहे. पण ती वरील काव्याच्या रंगातच वर्णिलेली काय ती आढळते.

**कुमार हकीकतराय :** याच कालात कुमार हकीकतराय नावाच्या एका हिंदु मुलाने शाळेतील पाटीपूजेच्या दिवशी देवीचे एक चित्र पाटीवर काढले होते ते पाहता त्या घोर अपराधासाठी(?) मुस्लिम अधिकाऱ्यांनी त्या लहान मुलास मुसलमान होण्याची शिक्षा दिली. त्याने ती नाकारताच त्याला ठार मारण्याचा धाक दाखविण्यात आला. तोही त्याने धाव्यावर बसविल्यामुळे आणि आपला हिंदुधर्म सोडण्याचे नाकारल्यामुळे त्यास ठार मारण्यात आले. त्या वीर हिंदुकुमाराची स्मृति हिंदुलोकांत पंजाबभर आजही प्रतिवर्षी एखाद्या धार्मिक सणासारखी पाळली जाते.

गुरू गोविंदांचा अंत : गुरुगोविंदसिंहाच्या मुलांना वर उल्लेख केल्याप्रमाणे ठार मारल्यानंतर पंजाबच्या रानावनात भटकत असता गुरुगोविंदाने औरंगजेबास एक त्याची काहीशी मनधरणी करणारे पत्र लिहिले. राजकारणात हे डावपेच चालायचेच. बादशहानेही त्याचे उत्तर दिले. शेवटी

काही तडजोड होऊन गुरु गोविंदसिंहाने पंजाब सोडून बाहेर जावे, असे काहीसे ठरले. तेव्हा गुरु गोविंदसिंह हिंडत हिंडत महाराष्ट्रात नांदेड येथे जाऊन राहिले. तेथे त्यांचे कर्मचारी असणाऱ्या दोघा पठाण युवकांनी कट करून ते निजले असता त्यांच्यावर खड्ग चालविला. त्या झटापटीत जे प्राणघातक घाव गुरु गोविंदाला लागले त्यातच त्यांचा अंत झाला.

गुरु गोविंदसिंह ह्याचे लहानपण पंजाबात गेले नसून त्यांच्या सुरक्षिततेसाठी बिहारात पाटणा येथे व्यतीत झाले होते. त्यामुळे त्यांना तिकडील हिंदी भाषेचा लळा लागलेला होता, नि तीत त्यांनी पुढे विद्वताही संपादन केली होती. त्यांनी त्यांचे लिहिलेले 'विचित्र नाटक' या नावाचे आत्मवृत्त, हा महत्वाचा ग्रंथ, त्या हिंदीतच लिहिलेला आहे, गुरुमुखी म्हणजे पंजाबी भाषेत नव्हे. त्याने चंडिकेवरही अनेक वीररसपूर्ण कविता लिहिलेली आहे. प्रत्यक्ष 'खड्गाला' तर त्यांनी चंडिकेचे प्रतीक म्हणून गौरवून त्यावर एक लहानसे स्तोत्र रचले आहे. त्याचे आमच्या इतर ग्रंथातूनही आम्ही वीररसप्लुत काही उतारे 'जय तेगम्' (जय खड्गम) या मथळ्याखाली दिलेलेही आहेत. या दशम गुरुची म्हणजे वीर गुरु गोविदसिंहाची वाणी हिंदीमध्ये असल्यामुळे आणि त्यांनी खालसा पंथाला दिलेली दीक्षाही नानक-परंपरानुगत शीख सनातन्यांना तितकीशी रुचत नसल्यामुळे सर्व शिखांचा मिळून मागे जो उल्लेखिलेला आदिग्रंथ आहे त्या ईतर नउ गुरूंची वाणी एकत्र केली असताही या दशम गुरु गोविंदसिंहाचे तेवढे ग्रंथ समाविष्ट केलेले नाहीत. या अंतर्गत कलहामुळेच खालसापंथाने 'दशम ग्रंथ' म्हणून गुरु गोविंदांची वाणी तेवढी एकत्र केलेली आहे.

दुसरी एक महत्वाची गोष्ट तेवढी हिंदुत्वदृष्टीने येथे सांगितली पाहिजे की खालसा पंथाच्या उत्पत्तीमुळे शिखांत सहजधारी नि केशधारी असे दोन पंथ प्रचलित झालेले आहेत. सहजधारी हे केवल नानकपंथी आचार  पाळतात. ते केस ठेवत नाहीत. इतर 'कक्के' ही पाळतातच असे नाही. सहस्रावधि हिंदु लोक, जे शीख-आचारही पाळतात ते, याच सहजधारी पंथात मोडतात. परंतु, हे ध्यानात ठेवले पाहिजे की, शिखांना वीरवृत्तीचे पोलादी रसायन पाजून जर कोणी त्यांना जिवंत, लढाऊ नि पंजाबातील प्रबळ मुस्लिम सत्तेचेही शस्त्रबळाने पूर्ण उच्चाटन करणारे हिंदु उपराष्ट्र घडविले असेल तर ते श्री गुरु गोविंदसिंहानेच होय!

**श्री वीर बंदा बैरागी** : हिंदुराष्ट्राच्या इतिहासात अमर झालेल्या वीरात्म्यात आणि हुतात्म्यात ज्याचे नाव केव्हाही गाळता कामा नये तो पंजाबात अत्याचारी मुसलमानांवर हिंदूंचा सूड घेणारा पहिला प्रत्याचारी आणि नुसता पराक्रमीच नव्हे, तर प्रत्याक्रमी असा हिंदु पुरुष म्हटला म्हणजे वीर बंदाबैरागी हा होय! श्री गुरु गोविंदसिंह पंजाब सोडून गेल्यानंतर महराष्ट्रात नांदेड येथे जेव्हा स्थायिक झाला तेव्हा तिकडे प्रख्यात असलेला जो एक वैष्णव साधुबाबा बंदा बैरागी त्याची नि गुरु गोविंदाची एकदा भेट झाली. पुढे हळूहळू गुरुने पंजाबमध्ये हिंदूंच्या उडालेल्या दुर्दशेचे, मुसलमानी बलात्काराने चालविलेल्या हिंदूंच्या मुस्लिमीकरणाचे, गुरु गोंविंदसिंहाच्या स्वतःच्या

कुलावर कोसळलेल्या अनर्थाचे आणि त्यांनी स्वतः केलेल्या युद्धाचे मर्मभेदी वृत्त बैरागी बंदाला विवरून सांगितले. आपल्या चार पुत्रांचा जो सूड घेईल असा हिंदु पंजाबात कोणीच उरला नाही, ही गुरु गोविंदसिंहाची दुःखद गाथा ऐकून बैरागी बंदाचे रक्त तापून गेले. त्यांनी आपले पूर्वाश्रमीचे धनुष्य-बाण हाती घेतले. गुरु गोविंदसिंहाने आपल्या सर्व शिष्यांना चिठ्ठी दिली की बंदाचे सर्वतोपरी साहाय्य करा. ती चिठ्ठी घेऊन हिंदूंवर केलेल्या अत्याचारांचा, मुसलमानांवरही तसेच प्रत्याचार करून, सूड घेण्याचा कृतनिश्चय केलेला हा हिंदु वीर पंजाबकडे गेला.

पण काय करावे? स्थलाभावासाठी आणि आता अधिक लिखाण लिहिणे आम्हाला कोणत्याही प्रकरणी अशक्य झाल्यामुळे जे काही लिहिले आहे त्याच्या समारोपापुरते लिहून आता हा ग्रंथ संपविणे भाग आहे. नाही तर बाबा बंदाने मुसलमानांची पंजाबात उडविलेली ससेहोलपट, त्याने केलेला शिरच्छेद, मुसलमानांनी हिंदु स्त्रियांच्या केलेल्या विटंबनेचा घेतलेला जशास तसा सूड, ज्या सरहिंदला गुरु गोविंदसिंहाचे लहान दोन पुत्र मुसलमानी भिंतीत चिणून मारले, त्या सरहिंद नगराला जिंकून घेऊन त्यातील मुसलमानी वस्ती जाळून टाकून मुसलमानी सरदारांच्या बायकामुलांसुध्दा भर उन्हात अनवाणी काढविलेल्या धिंडी, आणि मुसलमानांनी स्वधर्म न सोडण्यासाठी हिंदूंचे केले होते तसेच मुसलमानांचेही केलेले असह्य छळ, ह्यांचे आणि साऱ्या पंजाबात हिंदु-राजसत्तेची त्याने पिटलेली यशस्वी ग्वाही याचे संक्षिप्त वर्णन तरी आम्ही केलेच असते. ह्या ग्रंथाच्या पूर्वार्धात प्रकरण सहामध्ये हिंदूंनीही तुरळक प्रसंगी मुसलमानांवर धार्मिक स्वरूपाच्या केलेल्या प्रत्याचारांनी मुसलमान समाजाचाही भयाने कसा थरकाप उडे, ते दाखविलेच आहे. बाबा बंदानेही पंजाबात तशाच प्रत्याचारांनी मुसलमानांचा थरकाप उडविला. शेवटी दिल्लीच्या बादशहाने पंजाबवर मोठे सैन्य धाडले. वृकयुद्धाच्या (गनिमी काव्याच्या) पद्धतीने वीर बंदाच्या सैन्यपथकांनी त्या मुसलमानी सैन्याचा अनेक ठिकाणी पराजय केला. पण या धुमाकुळीत वीर बंदा बैरागी स्वतःला हिंदूंचा सेनापती असे जे म्हणवी त्याचे 'खालसा' पंथातील शीख लढवय्यांना मोठे वैषम्य वाटू लागले. ते वाढता वाढता वीरबंदाने एकत्रित केलेल्या हिंदूंच्या सैन्यात फाटाफूट होऊन खालसा पंथाचे शीख त्या प्रतापी सेनानीला वीर बंदा बैराग्याला सोडून गेले. पण त्या एकट्या खालसा पंथात काही मुसलमानांना जिंकण्याची धमक नव्हती. त्यामुळे, मोगलांच्या सैन्याचे बळ वाढून एका निकराच्या लढाईत तो पराक्रमी सेनानी वीर बंदा बैरागी, त्याच्या एकुलत्या पुत्रासह आणि निकटच्या सहकाऱ्यांसह मुसलमानांच्या हातात सापडला. वीर बंदाच्या अंगात काही अद्भुत जादू भरलेली आहे अशी भाबडी भीती बहुतेक मुसलमानांत भेदरवीत असे. बंदा वीराला पकडून बेड्या ठोकल्या तरी या जादूने वेळी-अवेळी मांजर बनून भरसैन्यातून निसटून जातो  अशी समजसुद्धा मोठमोठ्या मुस्लिम अधिकाऱ्यांची झालेली असे. त्यामुळे, त्या जादूपायी पहाता-पाहता तो पळून जाईल या भीतीने भलामोठा लोखंडी पिंजरा करून त्यात त्यास इतर अनेक पाडाव केलेल्या हिंदू बंदिवानांसह कोंडून मोठ्या मुस्लिम सैनिक पथकासह दिल्लीस धाडून देण्यात आले. दिल्लीला त्याला बादशहासमोर जेव्हा आणण्यात आले तेव्हाचा तो भयंकर

प्रसंग!! वीर बंदा, त्याचा एकुलता एक लहानसा पुत्र आणि त्याचे शंभर एक शिष्य यांचे, ते हिंदुधर्म सोडीनात म्हणून झालेले असह्य छळ नि हत्या, ते वाहिलेले रक्ताचे पाट! बंदा वीराला तर शिरच्छेद न करता केवळ छळापायी ठार मारण्याच्या हेतूने लाल लाल तापलेल्या सांडसाने भोसकून भोसकून त्याच्या शरीरातील मांसाचे उपसलेले लचके! हे सर्व अघोर वर्णन करण्यास येथे स्थळ नाही; पण प्रत्येक कृतज्ञ नि अभ्यासू हिंदूने ते वर्णन शिखांच्या आणि स्वतः मुसलमानांच्या तत्कालीन लिहिलेल्या ग्रंथातून आहे तितके तरी अवश्य वाचावे!

**आम्ही लिहिला होता तो शिखांचा इतिहासः**

आम्हाला दुःख वाटते की, आम्ही लिहिलेल्या शिखांच्या इतिहासातूनच ते वाचावे, असे आज आम्हास सांगता येत नाही. त्याचे कारणही येथे थोडक्यात सांगितले पाहिजे. इंग्लंडमधून साधारणतः सन १९०९ मध्ये राज्यक्रांतीच्या उलाढालीत आम्ही फ्रान्समध्ये जेव्हा गेलो तेव्हा श्रीमती मॅडम कामा यांच्या घरी एक दोन महिने होतो. तेवढ्या वेळात आमच्यापाशी संग्रहिलेल्या साधनांना उपयोजून आम्ही शिखांचा दोनशेएक पानांचा साधार नि रक्त सळसळविणारा इतिहास मराठीत लिहिलेला होता. वाङ्मयातील अगदी प्रथम लिहिलेले पुस्तक म्हणून जे समजले जाते त्या 'भाई बाळाकी जनमसखी' म्हणजे गुरु नानकाच्या प्रत्यक्ष जीवनाची भाई बाळा नावाच्या शिष्याने लिहिलेली गाथा ह्या पुस्तकापासून तो दशम गुरुच्या दशमग्रंथापर्यंत बहुतेक मूळ लिखाणांचा अभ्यास केलेला होता. शिखांचा कनिंगहॅम प्रभृति इंग्रजी इतिहास तर वाचलेलेच होते. महाराजा रणजितसिंगाने पंजाबातून मुसलमानांचे राज्य उखडून देऊन जे शतद्रु (सतलज) ते सिंधुपर्यंत आणि वर जम्मू-काश्मीरपर्यंत विस्तारलेले नवे हिंदुराज्य स्थापले आणि जयपाळ नि अनंगपाळ यांच्या प्राचीन पराभवांचा सूड उगविला, त्या महाराज्याच्या स्थापनेपर्यंतचा वृतांत आमच्या ग्रंथात आम्ही आणलेला होता. पण आम्हास आजही ही गोष्ट मनात बोचत आहे की, त्या इतिहासाचे ते हस्तलिखित बहुधा इंग्रजांच्या हातात पडून आज नष्ट झालेले असावे! नाहीतर ज्याच्या हाती आम्ही ते लिखाण छापण्यासाठी गुप्तपणे हिंदुस्थानात धाडले होते त्यांनी येता येता इंग्लिश आरक्षकांच्या (पोलिसांच्या) झडतीच्या भीतीने ते समुद्रास्तृप्यंतु केलेले असावे! अर्थातच, तो आमचा मराठी ग्रंथ प्रकाशित होण्याचे आधीच लुप्त झालेला आहे. नष्टच झालेला आहे. !!

तरीही, ज्याला श्री. बंदा वीराच्या नि त्याच्या त्या हिंदु सैनिक पथकाच्या अमर हौतात्म्याची ती भीषण कथा वाचावयाची असेल त्याने आमची त्या प्रसंगावरची अंदमानात लिहिलेली जी एक कविता आजही उपलब्ध आहे, ती तरी वाचावी.

वीर बंदाच्या शिष्यांमधील आख्यायिकेप्रमाणे बंदा वीराला तो मेला असे समजून, शेवटी, त्याचा देह त्या मुस्लिम राक्षसांनी एका उकिरड्यावर दिल्लीबाहेर फेकून दिलेला होता. पण, त्याच्या काही शिष्यांनी अद्भुत वनस्पती त्यास खावविल्यामुळे तो शुद्धीवर आला आणि त्या शिष्यांनी त्यास लगोलग गुप्तपणेच पंजाबात नेले. पुढे त्याचे एक गुरुपीठच स्थापन झाले आणि

शेकडो शीख त्याचे अनुयायी म्हणून 'बंदई' या नावाने ते गुरुपीठ बंदा वीराच्या वंशाकडे अजूनही नांदवीत आहेत. पुढील रामसिंग गुरुंच्या कुका शीख संप्रदायाप्रमाणेच ते स्वतःला कट्टर हिंदू समजतात.

बंदा वीराच्या मृत्यूनंतर खालसा शिखातील आणि खालसा या उपपंथाच्या बंदई, सहस्रधारी इत्यादी इतर शिखांतील कोणाही शीख संप्रदायाचे पंजाबात राजकीय आणि सैनिक बळ असे काही वर्षे उरले नाही. जिंकडे तिकडे फाटाफूट! परंतु, उलटपक्षी बंदा वीरापर्यंत लढता-लढता मुसलमानांचीही राजकीय सत्ता मोडकळीसच आल्यासारखी झाली होती. दिल्लीसही तीच स्थिती होती. परंतु साऱ्या हिंदुस्थानात त्या वेळी बळावत चाललेल्या हिंदूंच्या नव्या धुरंधर शक्तीची-मराठ्यांची-सैनिक नि राजकीय महत्वाकांक्षा मात्र बळावत चालली होती. मात्र, प्रत्यक्ष दिल्लीहून पंजाब ते मुलतान, काश्मीर, कंदाहार प्रांतापर्यंत मोगल बादशाही नावापुरती तेवढी उरलेली होती. ठिकठिकाणचे पुण्डगुण्ड आपापल्या टोळ्यांसह पुंडाई तेवढी माजवीत होते.

त्यानंतर, शिखांच्या सत्तेची वाढ कशी कशी होत गेली आणि शेवटी, महाराजा रणजितसिंगाच्या पंजाब ते काश्मीरपर्यंतच्या साऱ्या प्रांतांत मुसलमानी राज्याचा अंत होऊन हिंदु स्वातंत्र्याचा पुनरुदय कसा झाला, ते सर्व वृत्त याच स्थळी नुसते सूचित करणे काय ते शक्य आहे. कारण या 'समीक्षक ग्रंथा' चा जो संकल्पित काळ आहे त्यापुढील काळात त्या ऐतिहासिक घटना घडत आहेत.

तथापि, दोन-तीन विधेये मात्र या पंजाबी इतिहासातील काळाविषयी येथे सूत्ररूपाने काय ती सांगणे शक्य आहे नि अवश्यही आहे.

(अ) पंजाबमधील मुसलमानांची राजसत्ता उलथून टाकून त्याला स्वतंत्र करण्याचा पहिला यशस्वी प्रयत्न मराठ्यांनी केला. शिखांच्या इतिहासात काय किंवा एकंदर उथळपणे लिहिलेल्या भारतीय इतिहासातून काय, शिखांनी पंजाबातून मुसलमानी सत्ता प्रथमतः उखडून दिली असा जो ढिला समज प्रचलित आहे तो चुकीचा आहे. शिखांची राजसत्ता जेव्हा अगदी उत्कर्षास पोचली होती तेव्हाही, ते शेजारच्या दिल्लीलासुद्धा पूर्णपणे जिंकून घेऊ शकले नाहीत, हे निक्षून सांगण्यात शिखांचा उणेपणा दाखविण्याचा मुळीच उद्देश नाही. पण, मराठ्यांच्या खऱ्या राष्ट्रीय पराक्रमाला खोट्या बढाया मारून उणेपणा आणू पाहणाऱ्या निंदकांची तोंडे तेवढी बंद करण्याचा हेतू आहे. पंजाबातल्या पंजाबात तरी मुसलमानी बादशाही उलथून पाडून महाराणा राणजितसिंगाच्या राज्यासारखे स्वतंत्र हिंदुराज्य स्थापण्याचे श्रेय एकंदरीत मुख्यत्वेकरून आमच्या शीख संघटनेलाच आहे हे निर्विवाद. पण पुण्याहून निघून खाली तंजावरपर्यंत आणि वर सिंधु नि सिंधुच्याही पलीकडे हिंदुराष्ट्राचा लढता नि चढता ध्वज नेऊन रोवणाऱ्या आणि दिल्लीच्या मुस्लिम बादशहाला तथाकथित बादशहा करून सोडणाऱ्या मराठ्यांच्या प्रचंड पराक्रमाला त्या सात शतकांच्या कालखंडाच्या हिंदु-इतिहासात तरी तोंड नाही, हेही पण निर्विवादच आहे!

(आ) नेपाळचे स्वतंत्र हिंदुराज्य : आपल्याकडे लिहिल्या गेलेल्या बहुतेक भारतीय म्हणविणाऱ्या इतिहासग्रंथातून किंवा शालेय पुस्तकांतून इतर सर्व भारतीय प्रदेशांचा उल्लेख असतो. पण आश्चर्य असे की, नेपाळच्या प्रदेशाचा नि तेथील शूर हिंदुराज्याचा नावापुरता सुद्धा उल्लेख नसतो. जणू काय नेपाळ हा भारतीय हिंदुराष्ट्राचा कोणीच लागत नाही! पण वस्तुतः जितका महाराष्ट्र, पंजाब किंवा मद्रास हे प्रदेश हिंदुराष्ट्राचे अविच्छेदनीय अंश आहेत तितकाच नेपाळ हाही अविच्छेदनीय अंशच आहे. या प्रांताच्या किंवा उपप्रांताच्या राजसत्ता प्रसंगी निरनिराळ्या असतील; परंतु राष्ट्र असे, हे सर्व उपभाग ह्या हिंदुराष्ट्राचेच अंगभूत आहेत, हिंदुराष्ट्राशी ते एकजीव झालेले आहेत. हिंदुस्थानातील इतर प्रांतांवर आशियातील मुसलमानांची आणि युरोपियन म्लेंच्छांची त्या गेल्या नऊ-दहा शतकांत अनेक आक्रमणे आणि सतत युद्धे झाली, पण सुदैवाने नेपाळमध्ये मात्र त्या म्लेंच्छांचा राजकीय किंवा धार्मिक स्वरूपाचा तितका उपद्रव होऊ शकला नाही. एकंदरीत हिंदुधर्म नि हिंदुस्वातंत्र्य, म्लेंच्छांचे तसले उपद्रव हाणून पाडून नेपाळमध्ये स्वतंत्रपणे नांदू शकले. ह्यामुळे खरे म्हटले असता, हिंदुराष्ट्राचा नेपाळ हा भाग एक उत्तमांशच समजला गेला पाहिजे. आणि आपल्या हिंदुराष्ट्राच्या इतिहासात नेपाळला मानाचा नि प्रतिष्ठेचा पहिला प्रणाम केला गेला पाहिजे! पण वस्तुतः आपल्या विवेकशून्यतेमुळे परिणाम उलटाच झालेला आहे. आमच्या इतर भारतीय प्रांतातील पारतंत्र्याच्या चिखलात नेपाळ रुतला गेला नाही, त्याचा ह्या उलाढालीशी संबंध आला नाही; म्हणूनच, आपल्या ह्या उथळ भारतीय इतिहासग्रंथात नेपाळचे नावही चुकतमाकतच येते किंवा येतच नाही!

हा स्वाभिमानशून्य विपर्यास निरस्त करण्यासाठी आम्ही नेपाळच्या आंदोलनाची एक हिंदुसंघटित स्वतंत्र चळवळच सन १९२४ त अंदमानहून सुटताच हिंदुस्थानभर चालविली होती, हे प्रसिद्धच आहे. त्याच वेळी ‘नेपाळी आंदोलनाचा इतिहास’ हे स्वतंत्र पुस्तकही आम्ही लिहिले आहे आणि त्यात नेपाळच्या पराक्रमी इतिहासाचे आणि त्यांनी केलेल्या अखंड नि यशस्वी हिंदुस्वातंत्र्य संरक्षणाचे वृत्त दिलेलेच आहे. ह्या समीक्षणात्मक ग्रंथात मात्र स्थलाभावी ते वृत्त देण्याची शक्यता आता उरली नाही. आवश्यकताही तितकीशी नाही. गेल्या दहा शतकांच्या प्रारंभी, नेपाळात, प्रथम आमच्या नेवारी हिंदूंचे राज्य होते. त्यानंतर जिंकडेतिकडे राजपुतान्यांतून मुस्लिमांच्या उपद्रवाने जे पराक्रमी राजपुरुष मेवाडातून इतरत्र भाग्योदय करण्यास निघून गेले त्यातीलच एक पराक्रमी राजपूत नेता आपल्या अनुयायांसह हिमालयाच्या नेपाळकडच्या प्रांतात शिरला. त्याने एक छोटेसे स्वतंत्र हिंदुराज्य स्थापले. पुढे, होता होता, ह्या राजपुतांनी काटमांडूपर्यंत प्रदेश व्यापला नि ते नगर आपली राजधानी केली. ते प्रबळ हिंदुराज्य त्यांनी स्थापन केले तेच आजचे हे नेपाळी राज्य होय. भारतीयांचे चित्त नेपाळच्या महत्वाकडे आणि हिंदुराष्ट्राचे नेपाळातील हिंदूंशी असलेल्या एकात्मतेच्या नि एकजीवित्वाच्या नात्याकडे वेधण्यासाठी इतका काय तो नेपाळच्या इतिहासाचा नामोल्लेख इथे पुरे आहे! हे राजपुत कट्टर गोरक्षक असल्यामुळे त्यांना हळूहळू गोरखा हेच जातिवाचक नाव पडले.

येथे कालक्रमाने, पुढचे असले तरी, हेही सांगून टाकतो की, भारतावर इंग्रजांचे राज्य असताना सर्व जगात जे सहस्रावधि गुरखा सैनिक इंग्रजांच्या सैन्यात सेवेस राहिलेले होते त्यांनी युरोपातील दोन्ही महायुद्धांमध्ये शौर्य गाजविले आणि इंग्लंडातील, अमेरिकेतील आणि जर्मनीतीलही उत्कृष्ट सैनिकांना चकित करावे असे सैनिक नैपुण्य नि पराक्रम दाखविला. त्यामुळे, आज साऱ्या जगात गुरखा सैनिक म्हणजे उत्कृष्ट सैनिक अशी म्हणच पडल्यासारखे झाले आहे.

(अ) अकबराचे उत्तरजीवन - अकबराने त्याच्या पूर्वजीवनात हिंदुधर्माचा नि राज्यांचा उच्छेद करण्यासाठी जी क्रूरता नि जे अत्याचार केले त्याचे वर या ग्रंथातच केलेले अगदी संक्षिप्त उल्लेखसुद्धा हे सिद्ध करावयास पुरेसे आहेत की, राक्षसी धर्मवेडाने नि हिंदुद्वेषाने अकबरही तितकाच पछाडलेला होता, जितका एखादा अल्लाउद्दिन वा औरंगजेब पिसाळलेला होता.

अकबर हा इतर मोगल किंवा मुस्लिम आततायींप्रमाणे नव्हता, तर तो हिंदुधर्माचा द्वेष न करणारा, न्यायप्रिय, हिंदु किंवा मुसलमान असा क्षुद्र भेदाभेद न मानणारा समतेने राज्यकारभार चालविणारा, असा एक थोर मोंगल बादशहा होऊन गेला आणि म्हणून हिंदु लोकांनी त्याच्याविषयी अपार आदर नि कृतज्ञता मानली पाहिजे, असा युरोपियनांनी नि हिंदु लोकांनी लिहिलेल्या आजपर्यंतच्या इतिहास ग्रंथातून एकसुराने अकबराविषयी जो जयघोष सतत चालत आला आहे तो केवळ परकीय इतिहासकारांनी मायावीपणे आणि स्वकीयांनी दास्यप्रवण लांगूलचालक नि विवेकशून्यरीतीने चालविलेला आहे. आम्हा हिंदूंना एकतर आदर, पूज्यभाव, राणा प्रतापाशी दाखविता येईल किंवा त्याचा शत्रू जो अकबर त्याच्याशी दाखविता येईल. आम्हाला त्या दोघांचे सारखेच ममत्व कसे मानता येईल? देवाची आणि दैत्याचीही पूजा एकत्रच कशी बांधता येईल? राणा प्रतापसारख्या हिंदुराजाचे स्वातंत्र्य हिरावून त्यांच्यावर आपल्या दास्याचे जोखड बळाने लादणारा आणि हिंदुधर्माचा मानभंग करण्यासाठी त्या हिंदुराजांनी आपल्या मुलीसुद्धा मला दिल्या पाहिजेत, माझ्या जनानखान्यात कोंबल्या पाहिजेत, अशा उघडउघड अत्याचारी मागण्या करून त्यांचा क्रूर उच्छेद करणारा धर्मांध मुस्लिम अकबर कुठे आणि आपल्या हिंदुराष्ट्राचे राज्याचे आणि धर्माचे रक्षणार्थ लढत लढत प्राणत्याग करणारे आमचे राणाप्रताप, राणी दुर्गावती यांच्यासारखे सहस्रावधि हुतात्मे आणि वीरात्मे कुठे!

दुसरेही महत्वाचे विधेय (Point) आमच्या भाबड्या नि लांगूलचालक बहुतेक हिंदु लेखकांच्या अद्याप ध्यानात आलेले नाही, ते हे की, अकबर हा सर्व प्रजाजनांना समतेने वागविणारा आणि एकंदर मनुष्यामात्रातील समतेचा मोठा पुरस्कर्ता बादशहा होऊन गेला, असे जे ते शाळेतूनसुद्धा शिकवितात तेही अगदी अतथ्य आहे. मुसलमानांची वाहयात स्तुती करण्याच्या खोडीचा तो परिणाम आहे. कारण, अकबर हा मोंगल सम्राट होता. मोंगल साम्राज्याचा जो जो दास होणार नाही त्याचा त्याचा क्रूरपणेसुद्धा नायनाट करण्यास तो कचरत नसे, मग तो मुसलमान का

असेना. आता सारे मुसलमान काही मोंगल नव्हते. उलट अफगाण नि तुर्क सुलतानांच्या हिंदुस्थानात असलेल्या सुलतानशाहयाच अकबराने विनाशून मोंगल बादशाही वाढविली. त्यामुळे, ते मोगलांचा कट्टरपणे द्वेष करीत. म्हणजे हिंदुराज्याच्या विरूद्धच नव्हे, तर अकबर हा त्याच्या स्वतःच्या मोंगल बादशाहीकरता इतर कोणत्याही वैयक्तिक महत्वाकांक्षी बादशहाप्रमाणे लढत होता. राज्य विस्तारीत होता. अर्थात् तो सर्व मुसलमानांनासुद्धा समतेने वागवीत नव्हता. अनेक मुसलमानांची राज्येसुद्धा त्याने बुडविली, तुडविली. केवळ स्वतःची एकट्याची बादशाही टिकावी ह्याच उद्देशाने काय ते अकबराने त्याच्या उत्तरजीवनात हिंदूंवर जिझियासारखे अगदी उत्क्षोभक धार्मिक कर लादले नाहीत किंवा सशस्त्र लाखो हिंदूंना सरसकट मुसलमान करण्याची अभियाने (मोहिमा) काढली नाहीत. हिंदु मुसलमानांना समतेने वागवावे हा त्यामागे मुख्य उद्देश मुळीच नव्हता. पण, हिंदूंवर असे प्रत्यक्ष धार्मिक अत्याचार जेव्हा जेव्हा मुसलमानी सुलतानांनी मागे केले तेव्हा तेव्हा त्यांचे झालेले भयंकर परिणाम त्याच्या डोळ्यांसमोर होते. तशा प्रपीडक नि धर्मांध मुस्लिम सुलतानशाहयाच्या शाहयाच केव्हा केव्हा हिंदू असंतोषाच्या आगीत भस्म झाल्या होत्या! ह्यासाठी, अकबराने त्याच्या उत्तरजीवनात त्याची ती जवळजवळ साऱ्या उत्तर हिंदुस्थानवरची स्वतःची एकट्याची बादशाही शांतपणे नांदावी म्हणून, हिंदु काय-मुसलमान काय, अशा एकंदर प्रजेस, कर, वैयक्तिक न्याय इत्यादी प्रकरणी एखाद्या औरंगजेबापेक्षा पुष्कळ अधिक सौम्यपणे नि निरुपद्रवीपणाने वागविले. हिंदु-मुसलमानांच्या धर्मनिरपेक्षी एकात्मतेच्या आणि समतेच्या भावनेने नव्हे, किंवा मनुष्यमात्राच्या स्वतंत्रतेला आदरण्यासाठीही नव्हे! किंवा हिंदुधर्म हा 'काफरधर्म' होता अशी त्यांची अंतर्गत भावना नव्हती म्हणून तर नव्हेच नव्हे!

पण ऐहिक राजसत्तेत स्वतः सर्वसत्ताधीश, सम्राट, अगदी अरेराव झाल्यानंतर अकबराची दुर्दम्य महत्वाकांक्षा त्याहीपुढे धाव घेऊ लागली. लोकांचा ऐहिक सम्राट झालो, पण पारलौकिक मीच आहे, मी जगाचा पैगंबरही झालो पाहिजे, हीही इच्छा त्याच्या मनात जागृत झाली. त्या दृष्टीने त्याने 'दीने अलाही' नावाचा एक हिंदु नि मुसलमान या दोन्ही धर्मांहून वेगळा असा धर्म काढण्याचा घाट घातला. पण त्यातही, ध्यानात ठेवण्यासारखे असे की, हिंदूंना मागच्या मुस्लिम सुलतानांनी किंवा पुढे औरंगजेबाने जसे बलात्काराने मुसलमान बनविले तसे करणे अशक्य वाटून कारस्थानाने अकबराने या दीने अलाहीद्वारे हिंदुधर्माचा उच्छेद करण्याचाच प्रयत्न केला. कारण या धर्माचा मुख्य 'पैगंबर' अकबर हाच मानावा लागे. नुसते जयगोपाळ तर सोडाच, पण नमस्कार म्हणूनही भागत नसे, तर त्या अकबरी धर्मात गेलेल्या हिंदूंना प्रथम वंदनेतच 'अल्ला हो अकबर' असेच म्हणावे लागे! त्या धर्माची भाषाही पर्शियन अरेबिकच होती. एकंदरीत इतके सांगणे पुरे आहे की, अकबराची मनुष्यजातीचा पारलौकिक सम्राट बनण्याची ही सवाई शेख महंमदी महत्वाकांक्षाही धुळीस मिळाली. कारण, त्याच्या या नव्या धर्मात आधी कोणी फारसे हिंदू-मुसलमान गेलेच नाहीत; आणि जे तोंडपुजेपणापुरते अकबराचा धर्म मानीत तेही अकबर मरताच कुठच्या कुठे बेपत्ता झाले!

तथापि, त्या काळच्या जगतामध्ये जे जे थोर बादशाह, सम्राट, राज्यकर्ते युरोपात, आफ्रिकेत वा आशियात होऊन गेले, त्यामध्ये, एवढा कारस्थानी, नियंत्रक, पराक्रमी, साम्राज्याचा विजेता नि नियंता, विद्येचा, कलाकौशल्याचा भोक्ता, काही इतिहासकारांच्या मताप्रमाणे ज्याला स्वतः एक अक्षरही लिहिता-वाचता येत नव्हते, पण ज्याने मोठमोठ्या ग्रंथकारांना पदरी बाळगून नामांकित ग्रंथांची रचना करविली असा अकबर हाही एक थोर बादशहा होऊन गेला इतकी त्याची सापेक्ष स्तुती इतिहास करू शकेल. तो जितका मोठा होता तितका त्याला आम्हीही मोठा म्हणतो; पण त्यापुढे जाऊन आम्हा हिंदूंच्या दृष्टीने तो परकीय, परधर्मीय, अत्याचारी नि अधम होता, यासाठी आम्हा हिंदूंनी त्याचा धिक्कारही केला पाहिजे.

**प्रकरण ९ वे**

# आले! मुसलमानी राजसत्तेचे कर्दनकाळ मराठे आले!

वस्तुतः इतिहास म्हटला म्हणजे तो घडल्या घटनांचा अगदी हडकुळ्या गद्यासारख्या रोकड्या नि रुक्ष भाषेत सांगितला गेला पाहिजे, अशी सर्वसाधारण समज आहे. ती बहुतांशी सत्यही आहे. जे केवळ काल्पनिक नि काव्यमय आणि जे केवळ घटित नि अक्षरशः घडलेले त्याचे वर्णन हे भिन्नभिन्न प्रकारचे असलेच पाहिजे. त्याचे उत्कृष्ट व्यक्तीकरण सालंकृत काव्य किंवा हडकुळे कथन ह्या भाषा-प्रकारानेच होऊ शकते. केवळ घटनांचे संवत देणे, अमुक मनुष्य मेला, अमुक जन्मला, अमकी लढाई झाली, ह्या 'संवतात' मोठे अवर्षण (दुष्काळ) पडले इत्यादी नुसत्या घटितांचे - घटनांचे रोकडे टिपण हा इतिहासाचा मूलाधार असला तरी ते टिपण म्हणजेच काही इतिहास नव्हे. त्याला संवतावली (सनावली) म्हणता येईल परंतु निर्भेळ इतिहासात आणि काव्यातही काही प्रदेश असा असतो की, तो इतिहास नि काव्य यांच्या संयुक्त मिश्रणानेच यथार्थपणे व्यक्तविला जाऊ शकतो त्यावाचून त्या प्रसंगाच्या वर्णनाला जिवंतपणाच येत नाही. अशा प्रसंगी, इतिहास हा अकस्मात आपण होऊनच काव्यमय होतो. अशा प्रसंगी अगदी पुराणातील अद्भुत रूपकांचा, दैविक वर्णनशैलीचा अवलंब केल्यावाचून त्या घटनांचे अलौकिकत्व यथाप्रमाण असा रसरशीतपणे रंगविले जातच नाही. मनुष्याला साध्या घटना जशाच्या तशा गद्य भाषेत सांगता येतात. पण मनुष्याची प्रकृती नि स्वभावच असा घडविला गेला आहे की, उत्कट, भव्य, दिव्य, अलौकिक अशा कोणत्याही भावनांना रसरसून सोडणारी घटना, ती अगदी यथावत् घटना असली तरी, साध्या शब्दांत, रुक्ष गद्यात, सांगवतच नाही. त्यातं ती मावतच नाही. तेव्हाच तर मनुष्य अकस्मात खदखदून हसतो, कळवळून रडतो, आनंदाने नाचतो, संतापाने खवळून जातो, म्हणजेच उत्कट भावनेच्या भाषेतच तो बोलू लागतो. अशा उत्कट भावनेची नैसर्गिक भाषा म्हणजेच काव्य! मग ते प्रसंगी गद्यातही असू शकेल. उपमा, उत्प्रेक्षा रूपके इत्यादी अलंकार आभूषणांनी एखाद्या राजराजेश्वरासारखें ते गद्यही बहुधा विनटलेले असते.

**'निषादविद्धाण्डजदर्शनोत्थः श्लोकत्वमापद्यत यस्य शोकः।।'**

ही त्या आद्य कवीची साक्ष नाही का की, मूळ शोकाचा, काव्याचा, जन्मच मुळी साध्या शब्दात न मावणाऱ्या अत्युत्कट भावनेत झाला!

पण ऐतिहासिक, अलौकिक घटनांच्या भावनात्मक वर्णनात ही एवढी सावधानता मात्र अवश्य पाळली पाहिजे की, त्यायोगे त्या मूळ घटितांचे स्वरूपच विकृत न झाले पाहिजे. साधार इतिहासाचे स्वरूप त्या यथोचित भावनात्मक आरशातूनही स्पष्ट दिसले पाहिजे.

ज्या भारतीय इतिहासाच्या काळाविषयी ह्या ग्रंथात आपणांस आता चर्चा करावयाची आहे तो काळही हिंदुराष्ट्राच्या दृष्टीने अशा काही अलौकिक, हृदय हलवून सोडणाऱ्या घटितानी बहरलेला आहे की, त्यांना वर्णिताना भावनांची काव्यमय भाषाच काय ती जिवंतपणे नि यथार्थपणे त्यांचे व्यक्तीकरण करू शकेल!

ह्या ग्रंथाच्या गेल्या आठव्या प्रकरणात हिंदू-मुसलमानांचे सहा शतके चाललेले महायुद्ध साधारणतः इसवी सन सोळावे शतक उलटून जाऊन सतराव्या शतकांत प्रवेशले होते, पण ती शतके उलटून गेली तरी साऱ्या आशियातील अरब, अफगाण, पठाण, तुर्क, मोंगल इत्यादी साऱ्या मुसलमान जातींच्या त्या भीषण धार्मिक - राजकीय आक्रमणांनी वारंवार जर्जर झाले असताही हिंदुराष्ट्र त्या सतराव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत उत्तरेत काय किंवा दक्षिणेत काय नामशेष झाले नव्हते! नव्हे, तर रणांगणातच घायाळ स्थितीत काय होईना, पण झुंजत रहिले होते! उलट सन सातशेपासून तो सन १६०५ मध्ये अकबर मरेतोपर्यंतची ही दहा शतके हिंदु राष्ट्राशी सारखे झुंजता-झुंजता साऱ्या आशियातील वरील शत्रुपक्षिय मुस्लिम राष्ट्रांचेच आक्रमक बळ क्षीण होत चालले होते. आम्ही प्रकरण सहामध्ये भारतभर पसरू पाहणाऱ्या 'मुसलमान सत्तेच्या इतीश्रीची अथश्री' या मथळ्याखाली उल्लेखिलेली ती अथश्री इसवी सनाच्या चौदाव्या शतकापासूनच कशी होत चालली होती आणि विजयनगरसारख्या विजयशाली नवनव्या हिंदुराज्यांची स्थापना होण्याची शक्यता कशी निर्माण होत चालली होती, हे सत्य वर दाखविलेच आहे.

हिंदूंचे तेच पुनरुज्जीवन सामर्थ्य वाढत जाता जाता शेवटी आम्ही आता ज्या इसवी सनाच्या सतराव्या शतकाला पोचलो आहोत त्या क्षणास हिंदूंच्या त्या वर्धिष्णु सामर्थ्याचे धुरंधरत्व अंतिमतः यच्चयावत् भारतभर जो करू शकेल असा एक अपूर्व नि अलौकिक हिंदुवंश इतिहासगर्भ पौराणिक भाषेतच बोलावयाचे तर प्रादुर्भवण्याची भारताच्या अधिष्ठात्री देवतेलाच निकड लागली! प्राचीनकाळी शक-हूणादि म्लेच्छांचा निःपात करण्याची अशीच निकड भारतच्या अधिष्ठात्री देवतेला जेव्हा लागली तेव्हा तिने अबू पहाडावर एक महायज्ञ करून चार भारतीय वीर पुरुष निर्माण केल्याचे चांदभाट आपल्या महाकाव्यात 'अग्निकुलाची कथा' या कथेत सांगतात. परंतु दुर्दैवाने ह्या, आम्ही, ज्या कालाविषयी लिहितो आहो त्या, सन सतराव्या शतकाच्या, काळात भारतावर गुदरलेल्या हिंदू-मुस्लिम महायुद्धात मुस्लिम राजसत्तेच्या समूळ उच्छेदनासाठी केवळ चार दैवी वीर पुरुष उत्पन्न करून भागण्यासारखे नव्हते. त्या कार्यासाठी एक दैवी वीर पुरुषांची जातीची जाति उत्पन्न करावयास हवी होती. यास्तव महाकवी चांदभाटाच्या पौराणिक पण इतिहासगर्भ रूपकातच बोलावयाचे म्हणजे भारताच्या अधिष्ठात्री देवतेने साऱ्या भरतखंडावर दृष्टि टाकली. दहा शतकांवर चाललेल्या या हिंदु-मुस्लिम महायुदधाचा एकदाचा अंत

करून मुस्लिमांच्या राजसत्तेचे अंतिम निर्दालन करून टाकण्यास बहुतांशी समर्थ अशी हिंदु राष्ट्रवीरांची जातीची जातिच उत्पन्न करण्यास जाज्वल्य यज्ञभूमि ती हीच होय, अशा कार्यास अबूचे ते लहानसे यज्ञकुंड कसे पुरणार, असे मनात आणून त्या भारताच्या संकृद्ध अधिष्ठात्री देवतेने मंत्रोदकाचे सिचन दक्षिणेत सह्याद्रीवरच केले! आणि अकस्मात सह्याद्री पर्वतचा पर्वत पेटून उठला! अग्निकल्लोळावर अग्निकल्लोळ भडकत चालले! आणि त्यातून शतावधि-सहस्रावधि- लक्षावधि सशस्त्र वीर पुरुषांचे समूहचे समूह, जातीची जाती, राष्ट्रकूलचे राष्ट्रकूल प्रादुर्भवले! त्यातील ज्याने त्याने त्या ज्वालांच्या मालिकांतूनच एकेक ज्वाला उपटून, तिचाच आपल्या हातात भगवा ध्वज करून, मुसलमानी राजसत्तेच्या समूळ निर्दालनासाठी ते साऱ्या भारतभर 'हरहर महादेवा' चा रणघोष करीत चढून चालले! ह्या राष्ट्रकुलाचे नाव, 'शिवकालोत्पन्न महाराष्ट्र!

## साऱ्या जगातील अहिंदु शत्रूंशी एकटा हिंदु महाराष्ट्र झुंजला!

ह्याच काळी ह्या दशशतकव्यापी हिंदु-मुस्लिम महायुद्धाच्या रणघाईतच असा प्रसंग भारतावर आणि त्यातही महाराष्ट्रावर गुदरला होता की, तसा जिवावरचा प्रसंग जगातीलही तुरळक राष्ट्रांवरच काय तो गुदरल्याचे इतिहासातून आढळते! साऱ्या आशियातील अत्याचारी मुस्लिम राष्ट्रे भारतावर एकाच वेळी उत्तरेकडून कशी तुटून पडली होती ते सांगितले आहेच. पण त्या आशियातील अरब, पठाण, तुर्क, अफगाण, मोंगल प्रभृति मुस्लिम राष्ट्रांच्या समवेतच ह्या काळी विशेषतः दक्षिणेवर समुद्रातून पोर्तुगीज, डच, फ्रेंच, इंग्रज ह्या प्रबल नि आक्रमक युरोपियन राष्ट्रांचीही धाडची धाड हिंदुराष्ट्राचा नि हिंदुधर्माचाही उच्छेद करण्याच्या प्रतिज्ञेने यऊन कोसळली होती आणि जवळजवळ एकट्या त्या 'यज्ञोत्थित शिवकालोत्पन्न महाराष्ट्राला'च ह्या जगातील सर्व लुटारू अहिंदू राष्ट्रांच्या भयंकर आक्रमणांना एकाकी तोंड देणे भाग पडले! त्यातून जगाच्या इतिहासातील एक दुर्मिळ आश्चर्यकथा ही की, ह्या 'यज्ञोत्थित महाराष्ट्रा' ने त्या जगातील सर्व अहिंदू राष्ट्रांच्या सर्व भीषण आक्रमणांना यशस्वीपणे टक्कर दिली आणि ते त्या सर्व परशत्रूंना पुरून उरले!! दिल्लीच्या बादशाही तख्ताचे तुकडे तुकडे उडवून त्या वेळच्या मुस्लिम राजसत्तेची सगळ्या हिंदुस्थानात अंतिम इतिश्री केली!

महाराष्ट्राच्या ह्या अलोकसामान्य पराक्रमाची गाथा तिच्या सत्य स्वरूपात आता महाराष्ट्रातील लोकांना तरी साधारणतः परिचित झालेली आहे. रानडे, राजवाडे, खरे, इतिहासाचार्य सरदेसाई इत्यादी थोर इतिहाससंशोधकांना नि लेखकांना मराठ्यांच्या इतिहासाचे हे सत्य, दिव्य नि भव्य भारतीय स्वरूप प्रकटविण्याचे श्रेय आहे. पण एका रानड्यांचा अपवाद सोडला तर इतरांचे ग्रंथ मराठीत आहेत. मराठीवाचून जगातील इंग्रजी इत्यादी इतर भाषांतून मराठ्यांचे इतिहास

लिहिलेले आहेत, पण ते मुसलमान, पोर्तुगीज, इंग्रजादी आमच्या पूर्वीच्या शत्रूंनी जाणूनबुजून आणि भारतातील आमच्या भिन्न प्रांतीय देशबंधूंनी बहुतांशी अज्ञानाने, अगदी विकृत स्वरूपात लिहिलेले आहेत.

यास्तव मला तरी अगदी विद्यार्थिदशेपासून महाराष्ट्राचा हा शिवोत्तरकाली इतिहास त्याच्या आतापर्यंतच्या संशोधित झालेल्या स्वरूपात इंग्रजीत लिहिला जावा, म्हणजे जगाचेही डोळे उघडतील, असे उत्कटतेने वाटत होते. पण प्रथमपासून आमचे स्वतःचे कार्यक्षेत्र कर्तव्य म्हणून आम्ही इतिहासकालापेक्षा वर्तमानकाळाच्या कालक्षेत्रातील स्वराष्ट्राच्या शत्रूंशी झुंजणे हेच ठरविल्यामुळे ब्रिटिशविरोधी राज्यक्रांतीच्या कल्लोळांत आम्ही गुरफटून गेलो. यास्तव आम्हांला अंदमानातून सुटून येईतो महाराष्ट्राच्या जुन्या इतिहासाविषयी तसे काही लिहिण्यास वेळच मिळाला नाही. पुन्हा, केवळ इतिहासासच वाहून घेतलेल्या सरदेसायांसारख्या श्रद्धेय इतिहासकारांनीच हे काम हाती घेणे अधिक श्रेयस्कर नि श्रमविभागाच्या दृष्टीने सोयीस्कर असेही वाटून तशी खटपट आम्ही अधूनमधून करीत होतो.

## सरदेसाई स्वतःच मला भेटतात

उल्लेखानुरोधे अगदी तोंडीच आली म्हणून याविषयची एक आठवण येथेच सांगून टाकतो. आम्हाला सरदेसायांना भेटण्याची अगदी तरुणपणपासून इच्छा असे. कारण त्यांचेच इतिहास आम्ही सारखे वाचीत होतो. पण आम्ही राज्यक्रांतिकारक; ते एक उच्चपदस्थ राजसेवक, मग ते बडोद्याच्या संस्थानिका सारख्याचे का असेनात! पुन्हा ते प्रौढ; आम्ही लहान. पुढे आम्ही अंदमानात गेलो आणि सन१९२४ मध्ये तेथून सुटूनही आलो. आमच्या क्रांतिकालातील अनेक कृत्यांना सरदेसाई पराक्रम म्हणून गौरवितात, असे आम्ही तोंडोतोंडी ऐकत होतो. तेव्हा रत्नागिरीस आम्ही होतो तोपर्यंतही सरदेसायांनी इंग्रजीमध्ये मराठ्यांचा इतिहास लिहावा अशी आम्हांला तळमळ वाटे. तसे तोंडोतोंडी निरोपही आम्ही त्यांना अनेक वेळा धाडले. पण लेखी पत्र असे काही धाडवेना. कारण आमचे अक्षर म्हणजे विस्तवाची ठिणगी. एखादवेळी त्यांच्यासारख्या सरकारी अधिकाऱ्यांच्या घराला ती आगच लावून द्यावयाची! अशी उदाहरणे आमच्या क्रांतिकारक चळवळीत घडतही होती. म्हणून आपले चुप बसलो. एके दिवशी रत्नागिरीस आमचे घरी श्रीयुत नाना पटवर्धन यांचे जे घर आम्ही भाड्याने घेतले होते त्या घरी, दार उघडून एक वृद्धसे गृहस्थ आत आले. ‘कोण?’ म्हणून विचारीत आम्ही आदरार्थी थोडे उत्थापनही दिले. ते म्हणाले, ‘मी, तो बडोद्याचा सरदेसाई. इतिहास लिहितो म्हणून आपणांस ठाऊक असलेला, ‘ आम्ही एकदम चमकलो. ‘म्हणजे? रियासतकार की काय?’ ते म्हणाले, ‘होय.’ तेव्हा मी, ‘विद्यार्थी असतानाच त्यांचे प्रसिद्ध झालेले मुसलमानी रियासत हे मोठेपुस्तक कसे वाचले आणि तेव्हापासून अपल्याविषयी कसा आदर वाटत आला आहे, हे सांगितले. आपली आजपर्यंतची सगळी पुस्तके मी

